मावक पदे

संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
यांच्या आस्थापनेवरील मागासवर्ग शाखेतील
अस्थायी पदे दिनांक १.३.२०११ ते २९.२.२०१२ या
कालावधीकरीता पुढे चालू ठेवण्यास मंजूरी देणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
शासन निर्णय क्रमांक : सकआ-२०११/२७१/प्र.क्र.९७/२०११/आस्था-२
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १८ मार्च, २०११.

वाचा :

१) संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक : सकसं/आस्था-६/ मागासवर्ग/ अस्थायी पदे/२०११-१२/ का-६/ २९२, दिनांक ८/२/२०११.
२) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग सकआ-२०१०/प्र.क्र.९३/आस्था-२ दि.३१/०३/२०१०.

**<u>शासन निर्णय</u>** :- शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र. सकआ २०१०/प्र. क्र. ९३/आस्था -२, दिनांक ३१ मार्च, २०१० व शासन पूरकपत्र दिनांक ०८/४/२०१० व ०९/०७/२०१० अन्वये संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या आस्थापनेवरील मागासवर्ग कल्याण शाखेतील ३९०४ अस्थायी पदांना दि. २८.२.२०११ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मंजूरी देण्यात आली होती.

२. वर परिच्छेद १ मध्ये दर्शविलेली ३९०४ पदे मागासवर्गीय कल्याण शाखेचे कामकाज सुरळीतपणे पार पाडण्यासाठी पुढे सुरु ठेवणे आवश्यक आहेत. तसेच शासन निर्णय सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग क्र. सकआ-२००१/प्र.क्र.२५१/आस्था-२, दि. २७.२.२००४ अन्वये पदांच्या आढाव्यानुसार उच्चस्तर सचिव समितीने मान्य करुन तत्संबधीचे शासन निर्णय निर्गमित झालेले आहेत. अशा सर्व शासकीय विभाग व कार्यालयांच्या सुधारीत आकृतीबंधाला आवश्यकतेनुसार पुढील मुदतवाढ देण्याचे अधिकार शासन निर्णय वित्त विभाग क्र. असंक १००४/प्र.क्र.१२ (भाग-२)/२००४, वित्तीय सुधारणा-१ दिनांक ४.१०.२००४ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेले आहेत.

३. यास्तव, विवरणपत्र -अ येथे अ.क्र.५७ येथे नमूद केलेले संदेशवहक / चित्रपटदर्शक हे पद सेवानिवृत्तीनंतर व्यपगत झालेले असल्याने, ३९०४-१ = ३९०३ अस्थायी पदांना दिनांक १.३.२०११ ते २९.२.२०१२ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

४. तसेच शासन निर्णय क्र.बीसीएच-२००९/प्र.क्र.१४९ मावक-७, दिनांक ६..१२.२०१० अन्वये डॉ.बाबासाहेब आंबेडकर सामाजिक न्याय भवन नवीन पद निमितीबाबत ११ जिल्हयातील प्रत्येकी १६ याप्रमाणे एकूण १७६ नवीन पदांना मंजूरी देण्यात आलेली असल्याने, त्या १७६ पदांना देखील सन २०११-१२ या वर्षाच्या प्रस्तावामध्ये मुदतवाढ मंजूरी साठी प्रस्तावीत आहे. यास्तव, मागासवर्ग कल्याण शाखेअंतर्गत एकूण ३९०३ व सामाजिक न्याय भवन साठी १७६ अशा एकूण ४०७९ अस्थायी पदांना दिनांक १.३.२०११ ते २९.२.२०१२ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मंजूरी देत आहे.

५. तसेच असेही नमूद करण्यात येते की, संदर्भाधीन दिनांक २३ मार्च, २००९ अन्वये संचालक, समाजकल्याण, पुणे यांनी प्रस्तावित केलेली वरिष्ठ लिपिक ६६ व कनिष्ठ लिपिक ३३ ही पदांना देखील या आदेशान्वये दि.**१/३/२०१० पासुन २९/२/२०१२** पर्यंत मुदतवाढ मंजूरी देण्यात येत आहे.

१) या शासन निर्णयान्वये दिनांक २९.२.२०१२ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता दिलेल्या पदात :-

(अ) सन २०११-२०१२ या वित्तिय वर्षासाठी पुढे चालू ठेवण्यास विभागाने मान्यता दिलेली नाही अशा पदांचा समावेश नाही.

(आ) सहा महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त राहिलेल्या पदांचा समावेश नाही.

(इ) ठराविक कालावधीसाठी मंजूर केलेल्या पदांचा समावेश नाही.

६. १) मागासवर्ग कल्याण शाखेतील विवरणपत्र- अ मध्ये नमूद केलेली २८२९ पदे पुढे चालू ठेवण्याकरिता पदावरील वेतन खर्च खालील लेखाशीर्ष : -

**विवरणपत्र- अ - १)** - "२२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण - ०१- अनुसूचित जातींचे कल्याण-००१- संचालन व प्रशासन (०१) (०१) सामाजिक न्याय संचालनालय (मागासवर्गीय शाखा) (२२२५ ००९२)" मागणी क्रमांक एन-३" या आर्थिक लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०११-२०१२ या वित्तिय वर्षाकरिता मंजूर करण्यात येणा-या आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

२) नागरी हक्क संरक्षण अधिनियम १९५५ अंमलबजावणी करण्याकरिता निर्माण करण्यात आलेल्या पदांसाठी वेतन खर्चासाठी खालील लेखाशीर्ष : -

" २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण - ०१- अनुसूचित जातींचे कल्याण-००१- संचालन व प्रशासन (०३) (०१) नागरी हक्क संरक्षण कायदा अंमलबजावणीकरिता यंत्रणा मागणी क्रमांक एन-३ (२२२५ ०१५४) विघयो " मागणी क्र. एन- ३ या आर्थिक लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०११-२०१२ या वित्तिय वर्षाकरिता मंजूर करण्यात येणा-या आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

३) नवनिर्मित विभागीय समाजकल्याण अधिकारी, लातूर नव्याने निर्माण करण्यात आलेल्या पदांसाठी वेतन खर्चासाठी खालील लेखाशीर्ष : -

२२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण - ०१- अनुसूचित जातींचे कल्याण-००१- संचालन व प्रशासन (०३) (०४) सामाजिक न्याय संचालनालय (मागासवर्गीय शाखा) (२२२५ ३४-७६ (विघयो)" मागणी क्रमांक एन-३" या आर्थिक लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०११-२०१२ या वित्तिय वर्षाकरिता मंजूर करण्यात येणा-या आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

४) २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण - ०१- अनुसूचित जातींचे कल्याण-२७७- शिक्षण - (०१) (०१) अनुसूचीत जातीतील मुले व मुली यांच्याकरिता असलेल्या शासकीय वसतीगृहाचे परिरक्षण (२२२५-०२८-१) - ०१ - वेतन मागणी क्र. एन-३ या लेखाशिर्षाखाली सन २०११-१२ या वर्षाच्या आर्थिक तरतूदीतून भागविण्यात यावा.

५) २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण -
०३- मागासवर्गीयांचे कल्याण -
२७७ - शिक्षण व इतर मागासवर्ग कल्याण वसतीगृहे
(०५) (०१) आर्थिकदृष्टया मागासलेल्या मुलामुलींसाठी वसतीगृहे सुरु करणे व त्याची लेखभाल करणे.
(२२२५-०९-१३) - ०१ वेतन

७. **विशेष घटक योजनेखाली मंजूर असलेल्या पदांवर वेतन व भत्यासाठी होणारा खर्च**

२२२५-सामाजिक सुरक्षा व कल्याण
२२२५-अनुसूचित जाती, अनुसुचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण
०१- अनुसुचित जातीचे कल्याण, ००१- संचालक व प्रशासन

(०१) (०२) अनुसूचित जातीकरीता असलेली विशेष घटक योजनांसाठी शाखा मागणी क्र. एन-३ (२२२५-०१-०९)

६. **२२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण**

०१-अनुसूचित जातीचे कल्याण, ००१-संचालक व प्रशासन

(०२)-जिल्हा परिषद व पंचायत समिती १८३ अधिनियम १९६१

(०२) (०१)-महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ यांच्या कलम १८३ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदान (२२२५-०१-३६) (स्थानिक क्षेत्र) (कोषागारात देय) मागणी क्रमांक एन-३.

ब) **विवरणपत्र - ब मधील ३०० अस्थायी पदांकरीता**

२२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण

०१-अनुसूचित जातीचे कल्याण, ००१- संचालक व प्रशासन

(०३) (०४) पंचवार्षिक योजना राज्य योजनेतंर्गत योजना

(०३) (०४) सामाजिक न्याय संचालनालय (मागासवर्ग शाखा)

(२२२५-३४-७६)(विघयो) मागणी क्र. एन-३

या लेखा शिर्षाखाली सन २०११-२०१२ या वर्षाच्या आर्थिक तरतुदीतुन भागविण्यात येईल.

क) **विवरणपत्र-क मधील नवीन २८ वसतिगृहासाठी १४० अस्थायी पदांचा वेतनावरील खर्च.**

२२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण

०१-अनुसूचित जातीचे कल्याण

२७७-शिक्षण पंचवार्षिक योजना राज्य योजनेतंर्गत योजना

(०३) (०४) पंचवार्षिक योजना राज्य योजनेतंर्गत योजना (विघयो)

(०३) (१३)-अनुसूचित जातीतील मुंले व मुली यांच्याकरीता शासकीय वसतिगृह स्थापन करणे व त्यांचे परिरक्षण

(२२२५-३३४-२) नवीन वसतिगृह, मागणी क्र. एन-४

या लेखा शिर्षाखाली सन २०११-२०१२ या वर्षाच्या आर्थिक तरतुदीतुन भागविण्यात येईल.

(ड) **विवरणपत्र-ड-विमुक्त जाती जमाती व इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण संचालनालय नवीन कार्यालय निर्माण करण्यात आलेल्या ६५ पदांसाठी.**

२२२५- अनुसूचित जाती, जमाती, इमाव कल्याण

०३- मागासवर्गीयांचे कल्याण, ००१- संचालक व प्रशासन

(०१) (०१) **विमुक्त जाती जमाती व इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण संचालनालय**

(२२२५-३१३-५)-०१ वेतन. मागणी क्रमांक एन-२

(इ) **विवरणपत्र-इ- मधील १००+२८=१२८ नवीन शासकीय वसतिगृहांकरिता ६६८ अस्थायी पदे नवीन १०० वसतिगृहांकरिता**

२२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण

०१-अनुसूचित जातीचे कल्याण

२७७- शिक्षण पंचवार्षिक योजना राज्य योजनेतंर्गत योजना (विघयो)

(०३) (१३)-**अनुसूचित जातीतील मुले व मुली यांच्याकरिता शासकीय वसतिगृह स्थापना करणे व त्यांचे परिरक्षण** (२२२५-३३४-२) नवीन वसतिगृह मागणी क्र. एन-२ या लेखा शिर्षाखाली सन २०११-२०१२ या वर्षाच्या आर्थिक तरतुदीतुन भागविण्यात येईल.

(ई) डॉ.बाबासाहेब आंबेडकर सामाजिक न्याय भवन नवीन १७६ पद निर्मितीबाबत

२२२५- सामाजिक सुरक्षा व कल्याण,
२२२५- अनुसूचीत जाती, अनुसूचीत जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण,
०१-अनुसूचीत जातीचे कल्याण, ००१, संचालन व प्रशासन
(०१)(०२) अनुसूीत जातीकरिता असलेली विशेष घटक योजनांसाठी शाखा
मागणी क्र.एन-३ (२२२५-०१-०१)

७. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या दिनांक ४.१०.२००४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०११०३१८१६००१४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( कि. पां. वडते )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति.
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग आणि विशेष मागासप्रवर्ग कल्याण, पुणे,
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी,
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी,
सर्व समाजकल्याण अधिकारी (गट-अ), जिल्हा परिषद,
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर,
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभाग, व्यय-१४/अर्थसंकल्प-१९, मंत्रालय, मुंबई-३२,
कक्ष अधिकारी, (का.मावक-२, मावक-४ व अर्थसंकल्प) सा.न्या, सां. कार्य व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
निवड नस्ती-का. आस्था-२.

*****